विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळी सुरू करणे.
सन २०२०-२१ करिता निधी वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तंत्रनि-२०२०/प्र.क्र.२५/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ११ ऑगस्ट, २०२०.

**वाचा:-**

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्रमांक: टिईडी-२०१० /(३३४/२००९)/तांशि-५, दिनांक १३ सप्टेंबर, २०११,
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक: टिईडी-२०११/(३४७/२०११)/तांशि-५, दिनांक १९ जुलै, २०१२,
३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्रमांक: मान्यता-२०१४/प्र.क्र.७०/तांशि-५, दिनांक ०८जुलै, २०१४,
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक -अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४मे, २०२०,
५) अल्पसंख्याक विकास विभाग, - तंत्रनि-२०२०/प्र.क्र.२५/का.८,दिनांक ११ जून, २०२०,
६) संचालक,तंत्रशिक्षण संचालनालय,मुंबई यांचेपत्र क्र.९(१)/नियोजन/अल्प.उपयोगिता/२०२०/१३२, दिनांक २२ जुलै, २०२०.

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय अन्वये सन २०११-१२ पासून ठाणे, सोलापूर, जळगाव, नांदेड, यवतमाळ, मुंबई शहर व मुंबई उपनगर या ७ ठिकाणी, संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय अन्वये सन २०१२-१३ पासून रत्नागिरी, कराड, ब्रम्हपुरी, जालना, अंबड या ५ ठिकाणी व संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णय अन्वये सन २०१४-१५ पासून पुणे, लातूर, हिंगोली या ३ ठिकाणी अशा एकूण १५ ठिकाणच्या शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळी सुरू करण्यात आली आहे. त्यानुसार "मागणी क्रमांक झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (३०) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये दुसरी पाळी सुरू करणे, (२२३५ बी ०२२)" या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ करिता वेतन व इतर उद्दिष्टांकरिता रु.१५.०० कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. त्यापैकी संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये एकूण रू.९५,७४,०००/- (अक्षरी रू.पंच्याण्णव लाख चौऱ्याहत्तर हजार फक्त) निधी वितरीत करण्यात आला आहे. संदर्भ क्र.६ च्या पत्रान्वये संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांनी निधी वितरीत करण्याची विनंती केलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयास अनुसरून निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

विद्यमान १५ शासकीय तंत्रनिकेतनामध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळीवरील साठी वेतनावरील खर्च भागविण्यासाठी वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ चे शासन निर्णयानुसार सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता आवश्यक असणारा रू.३,३५,०९,०००/-(अक्षरी रू.तीन कोटी पस्तीस लाख नऊ हजार फक्त) खालीलप्रमाणे वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये दुसरी पाळी सुरू करणे (२२३५ बी ०२२) | सन २०२०-२१ साठी अर्थसंकल्पित करण्यात आलेले अनुदान | बीम्स प्रणालीवर वितरणाकरिता उपलब्ध निधी | शासन निर्णय दि.११ जून, २०२० अन्वये वितरित निधी | सन २०२०-२१ करिता वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| ०१, वेतन | ९,५७,४०,०००/- | ४,३०,८३,०००/- | ९५,७४,०००/- | ३,३५,०९,०००/- |
| **एकूण** | | | | **३,३५,०९,०००/-** |

२. सदर तरतूद संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते “नियंत्रक अधिकारी”आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून काम पाहतील.

३. या योजनेंतर्गत अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व खर्च मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची जबाबदारी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील.

४. सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय, कार्यालयीन आदेश, वित्तीय नियमावली, सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्य नियमावली, भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल, वित्तीय कार्यपध्दती आणि वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या संदर्भाधीन सूचना यांचा अवलंब करावा.

५. “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग दुसरा अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/ प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४ मे, २०२० मधील अटींची पुर्तता होत असल्याने प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.”

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२००८१११७०५२१७५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh M.
Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf,
serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.08.11 17:11:37 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर,
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर,
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन संस्था ( ठाणे, सोलापूर, जळगाव, नांदेड, यवतमाळ, मुंबई शहर, मुंबई उपनगर,रत्नागिरी, कराड, ब्रम्हपुरी, जालना, अंबड, पुणे, लातूर व हिंगोली )
६) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे मार्फत अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
८) सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी, संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे मार्फत
९) नियोजन विभाग का. १४७५,
१०) वित्त विभाग, व्यय-१/ अर्थ-३ व १४,
११) निवडनस्ती.